महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास माहे फेब्रुवारी,२०२४ चे सवलतमूल्याच्या प्रतिपूर्तीपोटी रु.३१०.४० कोटी इतका निधी वितरित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र.एसटीसी-०४२३/प्र.क्र.१५६/परि-१**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ मार्च, २०२४.

**संदर्भ :-** १) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/लेखा/नोंदणी/४५५, दि.१४.०३.२०२४.

२) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/लेखा/अंववि/४६०, दि.१५.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास माहे फेब्रुवारी, २०२४ चे सवलतमूल्य उपलब्ध करण्याबाबत उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांनी संदर्भाधिन पत्रांन्वये शासनास विनंती केली आहे. त्याअनुषंगाने महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास माहे फेब्रुवारी,२०२४ चे सवलतमूल्याच्या प्रतिपूर्तीपोटी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास माहे फेब्रुवारी,२०२४ च्या सवलतमूल्याच्या प्रतिपूर्तीपोटी रु.३१०.४० कोटी इतकी रक्कम (अक्षरी रूपये तीनशे दहा कोटी चाळीस लाख फक्त) रोखीने प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रु.३१०.४० कोटी हा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि सदर खर्च “मागणी क्रमांक बी-३, लेखाशिर्ष २०४१, वाहनांवरील कर (००) ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य) (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदरचे अर्थसहाय्य हे “बिनशर्त” आहे.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२६७/२०२४/व्यय-८, दि.२०.०३.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३२६१६०३५४५१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA MENDHE GANVIR

Digitally signed by SARIKA MENDHE GANVIR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=355d31d0cf7bf8d02352945a11a765b0f536fe1adfd0fff4aad6f9dd87f3d76b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D50DB68513E91376BA0547B675FDF1B1F3E1AB721046013C8F2C377536F96AC5, cn=SARIKA MENDHE GANVIR
Date: 2024.03.26 16:13:24 +05'30'

**( सारिका मेंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
५) मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
७) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
८) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
१०) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१२) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१३) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१४) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
१५) कक्ष अधिकारी (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती कार्यासन परि-१, गृह विभाग, मंत्रालय,मुंबई.